**आश्रमशाळा संहितेमध्ये नमूद केल्याप्रमाणे इतर विभागाचे अधिनियम, नियम, शासन निर्णय, परिपत्रके व आदेश या विभागस मार्गदर्शक म्हणून राहणार.**

**महाराष्ट्र शासन**
**विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्र. विभशा-२०१८/प्र.क्र.१८४/विजाभज-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दि. ०५ सप्टेंबर, २०१८.

**प्रस्तावना :-**

विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभागामार्फत विजाभज प्रवर्गाच्या विद्यार्थ्यांसाठी राज्यात प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक आश्रमशाळा चालविल्या जातात. राज्यातील विजाभज प्रवर्गाच्या आश्रमशाळांचे कामकाज योग्यरितीने चालविण्यासाठी या विभागातर्फे आश्रमशाळा संहिता लागू करण्यात आलेली आहे. सदरहू आश्रमशाळा संहितेमध्ये शासनाने, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, आदिवासी विभाग, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग आणि महिला व बाल विकास विभाग यांनी वेळोवेळी निर्गमित केलेले अधिनियम, नियम आणि शासन निर्णय व आदेश या विभागामार्फत चालविल्या जाणाऱ्या विजाभज आश्रमशाळांना लागू राहतील, असे आश्रमशाळा संहितेमध्ये वेळोवेळी नमूद केलेले आहे. परंतु, अन्य विभागाचे अधिनियम, नियम, शासन निर्णय अथवा आदेश या विभागाच्या विजाभज आश्रमशाळांना आपोआप स्वत:हून लागू होत नाहीत. त्यासाठी त्याबाबत येणारा वित्तीय भार, तसेच या विभागाची गरज इत्यादी बाबींचा विचार केल्याशिवाय लागू करता येत नाही. त्यासाठी या विभागाने त्यासंदर्भातील स्वतंत्र शासन निर्णय/आदेश/परिपत्रक इत्यादी निर्गमित करणे आवश्यक असते.

**शासन निर्णय :-**

विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभागातर्फे राज्यातील विजाभज आश्रमशाळांना लागू करण्यात आलेल्या आश्रमशाळा संहितेमध्ये शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, आदिवासी विभाग, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग आणि महिला व बाल विकास विभाग यांनी वेळोवेळी निर्गमित केलेले अधिनियम, नियम, शासन निर्णय व आदेश या विभागामार्फत चालविल्या जाणाऱ्या विजाभज आश्रमशाळांना लागू राहतील, असे आश्रमशाळा संहितेमध्ये वेळोवेळी नमूद केलेले आहे. त्यामुळे इतर विभागाचे अधिनियम, नियम, शासन निर्णय, शासन परिपत्रक अथवा आदेश इत्यादी या विभागास आपोआप लागू झालेले असल्याचा गैरसमज जणमाणसांत निर्माण झालेला आहे. परंतू अन्य विभागाचे अधिनियम, नियम, शासन निर्णय अथवा आदेश या विभागाच्या विजाभज आश्रमशाळांना लागू करण्यापूर्वी त्याबाबतचा वित्तीय भार, या विभागाची गरज इत्यादी बाबतचा विचार केल्याशिवाय या विभागाला लागू करता येणार नाही आणि कोणतीही बाब लागू करण्यापूर्वी त्याबाबतीत शासन निर्णय, शासन परिपत्रक अथवा आदेश काढणे आवश्यक आहे. त्यामुळे इतर विभागाचे अधिनियम, नियम, शासन निर्णय, शासन परिपत्रक अथवा आदेश इत्यादी आपोआप लागू राहणार नाहीत, हे स्पष्टीकरण देण्यात येत आहे. मात्र इतर विभागाचे अधिनियम, नियम, शासन निर्णय, शासन परिपत्रक अथवा आदेश इत्यादी या विभागासाठी मार्गदर्शक म्हणून काम करतील आणि या विभागाने त्याबाबतचा वेगळा शासन निर्णय, परिपत्रक, आदेश काढल्यानंतरच लागू राहील.

सदरील शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करुन देण्यात आलेला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१८०९०६१६५८०७१६२२ असा आहे. सदरहू शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhaurao Raghunath Gavit

Digitally signed by Bhaurao Raghunath Gavit
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=VJNT OBCS SBC Welfare Dept., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=692454783803b1bf08be0ff2505a01eb578c61edfbb827457be5704f5b440067, serialNumber=950bc6a64b0801087d4b403d7351619557bcd3489ca14b4e0f644bf05a04e89c, cn=Bhaurao Raghunath Gavit
Date: 2018.09.06 17:03:13 +05'30'

**(भा.र. गावित)**
**सह सचिव, महाराष्ट्रशासन**

**प्रत -**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री, विजाभज, इमाव व विमाप्र यांचे खाजगी सचिव
४. मा.राज्यमंत्री, विजाभज, इमाव व विमाप्र यांचे खाजगी सचिव
५. सचिव, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
६. संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
७. सर्व प्रादेशिक उपआयुक्त, समाज कल्याण विभाग
८. सर्व सहायक आयुक्त, समाज कल्याण
९. सर्व मुख्याध्यापक विजाभज प्राथमिक/माध्यमिक/उच्च माध्यमिक आश्रमशाळा
१०. निवडनस्ती (विजाभज-२)